**माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील वरिष्ठ सहायक संचालक (माहिती)/जिल्हा माहिती अधिकारी/ वरिष्ठ उपसंपादक/ जनसंपर्क अधिकारी, गट-अ (कनिष्ठ) संवर्गात सरळसेवेने नियुक्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र.माजम-२००९/६१९/प्र.क्र.२५८/२००९/३४-अ,**
**मंत्रालय, मुंबई - ४०००३२.**
**दिनांक : ३१ ऑगस्ट, २००९**

**शासन निर्णय-**

माहिती व जनसंपर्क महासंचालनायातील वरिष्ठ सहायक संचालक (माहिती)/जिल्हा माहिती अधिकारी/ वरिष्ठ उपसंपादक/ जनसंपर्क अधिकारी, गट-अ (कनिष्ठ) या संवर्गात सरळसेवेने नियुक्ती करण्यासाठी स्थापन केलेल्या निवड समितीने नियुक्तीसाठी शिफारस केलेल्या श्रीमती अर्चना प्रकाश शंभरकर यांना रुपये ९३००-३४८०० + ग्रेड वेतन ४६०० या वेतनश्रेणीत खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून दोन वर्षाच्या परिवीक्षाधीन कालावधीसाठी अ.जा. प्रवर्गातून नियुक्ती करण्यात येत असून त्यांच्या नावापुढे दर्शविलेल्या पदावर पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | उमेदवाराचे नाव | प्रवर्ग | अधिनता | पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती अर्चना प्रकाश शंभरकर | अ.जा. | चारित्र्य पडताळणी | वरिष्ठ सहायक संचालक (माहिती), गट-अ (कनिष्ठ), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई |

१. श्रीमती शंभरकर यांचा पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल अद्याप अप्राप्त आहे. त्या अहवालाच्या अधिनतेने सदर नियुक्ती देण्यात येत आहे.

२. (अ) श्रीमती शंभरकर हया माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) /जिल्हा माहिती अधिकारी/ वरिष्ठ उपसंपादक/ जनसंपर्क अधिकारी, गट-अ (कनिष्ठ) संवर्गातील पदावर दोन वर्षाच्या कालावधीसाठी परिवीक्षाधीन अधिकारी म्हणून कार्यरत असतील.

(ब) परिवीक्षाधीन काळात त्यांचे काम अपेक्षित दर्जाचे आढळले नाही किंवा त्यांची वर्तणूक समाधानकारक किंवा गट-अ दर्जाच्या अधिकाऱ्यास शोभेल अशी न आढळल्यास त्यांना सेवेतून कमी करण्यात येईल.

(क) परिवीक्षाधीन काळात श्रीमती शंभरकर यांनी शासकीय अधिकाऱ्यांसाठी विहित केलेल्या मराठी व हिंदी भाषा परिक्षा, जर त्या त्या परिक्षामध्ये यापूर्वीच उत्तीर्ण झालेल्या नसतील तर किंवा त्यांना अशा परिक्षेत उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर उत्तीर्ण होणे आवश्यक राहील.

३. श्रीमती शंभरकर यांनी आदेशाच्या दिनांकापासून **एक महिन्याच्या आत** संबंधित पदावर हजर होणे आवश्यक आहे. विहित केलेल्या मुदतीत पदस्थापनेवर हजर न झाल्यास निवडसूचीवरील त्यांच्या गुणवत्ताक्रमानुसार अनुज्ञेय असलेली संवर्गातील ज्येष्ठता त्यांना मिळणार नाही. तसेच प्रस्तुत नियुक्तीच्या संदर्भात त्यांच्याकडून वरील मुदतीत काहीही कळविण्यात न आल्यास निवडयादीवरील त्यांचे नाव कोणतीही पूर्वसूचना न देता काढून टाकण्यात येईल, व प्रतिक्षासुचीवरील उमेदवारास नियुक्ती देण्यात येईल.

४. वरिष्ठ सहायक संचालक (माहिती)/जिल्हा माहिती अधिकारी/ वरिष्ठ उपसंपादक/ जनसंपर्क अधिकारी, गट-अ (कनिष्ठ) या संवर्गात सरळसेवेने नियुक्त करण्यात आलेल्या उमेदवारांची जेष्ठता सामान्य प्रशासन विभागाच्या स्तरावर गुणानुक्रमानुसार स्वतंत्रपणे जाहिर करण्यात येईल.

५.	वर नमूद केलेल्या शर्तीव्यतिरिक्त सर्वसाधारणपणे राज्यसेवा, गट-अ (कनिष्ठ) अधिकाऱ्यांसाठी महाराष्ट्र शासनाने विहित केलेले इतरही सेवानियम या उमेदवारास लागू असतील व त्या नियमांचे पालन करणे त्यांना बंधनकारक राहील. नियमाविषयीचे अज्ञान ही बाब कोणतीही सवलत/सूट मिळण्यास ग्राहय ठरणार नाही.

६.	माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या स्तरावर त्यांनी उक्त संवर्गात नियुक्त झालेल्या उमेदवारांची वर नमुद केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता विहित कालावधीत करुन घ्यावी व तसा अहवाल शासनास सादर करावा.

७.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra,gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा **संगणक सांकेतांक २००९०९११५५८५१००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**सही /-**
**(सि.मं. इनामदार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

**महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.**
**संचालक (माहिती) (वृत्त/जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.**
**संचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.**
**महालेखापाल, मुंबई-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.**
**महालेखापाल, नागपूर-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.**
**महालेखापाल, मुंबई-१ (लेखा परिक्षा), मुंबई.**
**महालेखापाल, नागपूर-२ (लेखा परिक्षा), नागपूर**
**निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.**
**उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.**
**अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.**
**स्वीय सहायक, सचिव (मावज), सामान्य प्रशासन विभाग.**
**स्वीय सहायक, उपसचिव (३४ -अ), सामान्य प्रशासन विभाग.**
**सामान्य प्रशासन विभाग, का-१२, १६-ब व ३४**
**निवड नस्ती.**